## महाराष्ट्र शासन

**क्रमांक :- सनित- १५२३/ प्र.क्र.१४५/१३स,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
मंत्रालय, विस्तार इमारत,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १९ जुलै, २०२३.

संदर्भ :-१. शासनाचा क्रमाकं:- संकीर्ण- १२२३/ प्र.क्र.१३२/१३स, दिनांक २८ जून,२०२३ रोजीचा आदेश.
२.श्री.रविंद्र बंन्सीलाल संचेती व इतर ४ यांचे दिनांक ०७ जुलै,२०२३ रोजीचे पत्र.
३.राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र. रासनिप्रा/ कक्ष-७/ औरंगाबाद/दि वैजापूर मर्चंट को-ऑप.बँक/५१३१/२०२३, दिनांक ११.०७.२०२३ रोजीचे पत्र.

### आदेश

ज्याअर्थी, राज्यात ३० जून नंतर पर्जन्यमानाचे स्वरूप जास्त असल्याने उद्भवणारी नैसर्गिक आपत्ती, पावसामुळे जनजीवन व वाहतूक व्यवस्था विस्कळीत होण्याची शक्यता तसेच, सदर परिस्थिती पूर्वपदावर येण्यास लागणारा कालावधी विचारात घेता जास्तीत जास्त मतदारांना निवडणूकीमध्ये सहभाग नोंदवता यावा यासाठी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम १५७ अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारात कलम ७३कक मधील तरतूदीला सुट देवून २५० किंवा त्यापेक्षा कमी सदस्य संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्था तसेच, ज्याप्रकरणी मा.सर्वोच्च / मा.उच्च न्यायालयाने निवडणूक घेण्याचे आदेशीत केले आहे अशा सहकारी संस्था वगळून तसेच, ज्या सहकारी संस्थांची निवडणूक प्रक्रिया पुर्ण झाली आहे परंतु, अध्यक्ष व उपाध्यक्ष यांची निवड होणे बाकी आहे अशा संस्था वगळून, राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका या आदेशाच्या दिनांकापासून ज्या टप्प्यावर असतील त्या टप्प्यावर दिनांक ३० सप्टेंबर, २०२३ पर्यंत पुढे ढकलण्यात आल्या आहेत,

ज्याअर्थी, दि.वैजापूर मर्चंट को-ऑप बँक लि. वैजापूर, ता.वैजापूर, जि.औरंगाबाद या बँकेचे सभासद हे प्रामुख्याने नोकरदार व व्यापारी असल्याने अशा सभासदांचा शेतीच्या कामाशी प्रत्यक्ष संबंध येत नाही. त्यामुळे, बँकेचे सभासद खरीप हंगामात शेतीच्या कामात व्यस्त राहत नसल्याने ते

मतदानाच्या हक्कापासून वंचीत राहण्याचा प्रश्न उद्भवत नाही. तसेच, प्रस्तुत बँकेच्या निवडणूक प्रक्रियेतील नामनिर्देशनाचा टप्पा सुरू असून ४२ उमेदवारांचे नामनिर्देशन अर्ज प्राप्त झाले आहेत. या बाबी विचारात घेता, सदर संस्थेचा पुर्व नियोजित निवडणूक कार्यक्रम सुरू करणे यथोचित होईल,

त्याअर्थी, उपरोक्त सर्व बाबी विचारात घेता दि.वैजापूर मर्चंट को-ऑप बँक लि. वैजापूर, ता.वैजापूर, जि.औरंगाबाद या बँकेचा पुर्व नियोजित निवडणूक कार्यक्रम घेण्यास या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७१९१६५७४८०९०२ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.07.19 16:59:01 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था, औरंगाबाद.
४. जिल्हा उपनिबंधक/ उपनिबंधक, सहकारी संस्था औरंगाबाद.
५. निवडनस्ती, कार्यासन १३-स.